तातडीचे
**लोकलेखा समिती बाब**

क्रमांक: लोलेस-१०.१०/प्र.क्र.६६/ लोलेस.
महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग, मंत्रालय,
मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २० जुलै, २०१०

प्रति,

सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
मंत्रालय,
मुंबई - ४०० ०३२

**विषय :** लोकलेखा समितीची दिनांक ४ मे, २०१० रोजीच्या बैठकीत मा.समिती प्रमुखांनी दिलेल्या निर्देशाबाबत. स्पष्टीकरण ज्ञापनामध्ये आकडेवारी अंकात आणि अक्षरात दोन्ही स्वरुपात देणेबाबत.

संदर्भ : महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयांचे पत्र क्रमांक २९१४२ / म.वि.स./ लोलेस / ड-१, दिनांक ७.७.२०१०

महोदय / महोदया,

मा.सचिव प्रमुख लोकलेखा समिती यांनी दिनांक ४ मे, २०१० रोजीच्या बैठकीत असे निदेश दिले आहेत की भारताचे नियंत्रक व लेखापरीक्षक यांनी त्यांचे अहवालात घेतलेल्या आक्षेपा संदर्भात विभागाकडून जी ज्ञापने अथवा स्पष्टीकरणात्मक टिप्पणी सादर होते त्यात मंत्रालयीन विभागाकडून जी आकडेवारी देण्यात येते ती आकडेवारी लाखामध्ये वाचावी की कोटीमध्ये वाचावी हे स्पष्ट होत नाही. तरी यापुढे स्पष्टीकरणात्मक ज्ञापनात नमूद केलेली आकडेवारी अंकात आणि अक्षरात अशी दोन्ही स्वरुपात देण्यात यावी असे मा. समिती प्रमुख यांचे निदेश आहेत. मा. समिती प्रमुख ह्याच्या निदेशानुसार आपणास कळविण्यात येते की यापुढे लोकलेखा समितीवर स्पष्टीकरणात्मक ज्ञापने पाठविताना नमूद केलेली आकडेवारी अंकात व अक्षरात अश्या दोन्ही स्वरुपात देण्यात यावी.

२. सदर महाराष्ट्र शासनाच्या www Maharashtra gov. in या वेब साईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक- २०१००७२०१४४०३६००१ आहे.

आपला,

कृशकांबळे

( कृ.शे. कांबळे )
उप सचिव, वित्त विभाग.

प्रत माहितीसाठी अग्रेषित.

सह सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांना त्याच्या पत्र क्रमांक-२९१४२ / म.वि.स / लोलेस / ड-१, दिनांक ७.७.२०१०.